नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रातील अल्पसंख्याकांच्या आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक उन्नतीसाठी उपाययोजना करण्याबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१०/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- २४.१०.२०१८

वाचा :- १. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अ.वि.वि.-२०१५/प्र.क्र.२७५/का-५, दिनांक ०४.०७.२०१६
२. शासन परिपत्रक समक्रमांक, दिनांक ०५.११.२०१६.

**प्रस्तावना:-**

अल्पसंख्याक समाजातील युवक / युवतींना प्रगतीच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी व त्यांच्या प्रगतीमधील अडथळे समजावून त्यांच्यामध्ये जागृती करणे आवश्यक आहे. तसेच, अल्पसंख्याक युवक, युवतीमध्ये सकारात्मक बदल होऊन सामाजिक प्रगतीमध्ये त्यांचा सहभाग वाढविणे आवश्यक आहे. अल्पसंख्याक समुदायामध्ये विश्वासाचे व सौर्हादाचे वातावरण निर्माण होण्यासाठी नागरी भागातील अल्पसंख्याक विशेषत: मुस्लीम शहरी भागातील वस्त्यांमध्ये शासनाच्या नागरी सुविधा व सर्व योजनांची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार, शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, दिनांक ०४.०७.२०१६ अन्वये, अल्पसंख्याक युवकांची आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक उन्नती व त्यांच्यामध्ये सकारात्मक बदल घडविण्याबाबत उपाययोजना करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत.

०२. सदर शासन निर्णयानुसार, महाराष्ट्रामध्ये मेहमदूर रहेमान समितीच्या अहवालानुसार, महाराष्ट्रातील जवळजवळ ७० टक्के अल्पसंख्याक विशेषत: मुस्लीम शहरी भागामध्ये झोपडपट्टीमध्ये तसेच, वस्त्यांमध्ये राहत आहेत. त्यामुळे त्या वस्त्या सुधारण्यासाठी दरवर्षी अल्पसंख्याक बहुल भागात मुंबई शहर व उपनगरातील ५ व राज्यातील उर्वरित भागात १० क्षेत्रे निश्चित करावयाची आहेत.

०३. त्यानुसार, संदर्भाधीन परिपत्रकान्वये, खालीलप्रमाणे सुचना देण्यात आल्या आहेत.

प्रत्येक वर्षी मुंबई शहर व उपनगरातील ५ प्रभागांची निवड आयुक्त, बृन्हमुंबई महानगरपालिका यांनी करून त्याप्रमाणे शासनास अवगत करावे, अशा सूचना देण्यात आल्या होत्या व मागील दोन वर्षासाठी एकुण १० महानगरपालिका व १० नगरपरिषदा/पंचायती सदर उपाययोजनांसाठी संदर्भाधीन अ.क्र.२ येथील परिपत्रकान्वये निश्चित केल्या होत्या. आता सन २०१८-१९ साठी अल्पसंख्याकाच्या विकासाकरीता शासनाच्या नागरी सुविधा व सर्व योजनांची अंमलबजावणी करण्याकरीता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची निवड करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या क्षेत्रातील अल्पसंख्याकाच्या आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक उन्नतीसाठी उपाययोजना राबविण्याकरीता चालू वर्षासाठी लातूर, अहमदनगर, धुळे, उल्हासनगर, वसई-विरार या ५ महानगरपालिका तसेच, भातकुली जि. अमरावती, अकोट जि. अकोला, अचलपूर

जि. अमरावती, हिंगोली जि. हिंगोली, मलकापूर जि. बुलढाणा या ५ नगरपरिषदा / नगरपंचायती या उक्त शासन निर्णयाच्या अंमलबजावणी करीता निश्चित करण्यात येत आहेत.

या संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या क्षेत्रातील अल्पसंख्याकाच्या विकासाकरीता, शासनाच्या नागरी सुविधा व सर्व योजनांची अंमलबजावणी करावी. तसेच, अल्पसंख्याक बहुल भागामध्ये गटारे व मलनि:सारण इत्यादी सार्वजनिक स्वच्छता व आरोग्य व या दृष्टीने आवश्यक सुविधा उपलब्ध करून देण्यात याव्यात. अल्पसंख्याक क्षेत्रामध्ये, नियमितपणे पाणीपुरवठा केला जाईल, याबाबत योग्य ती दक्षता घ्यावी. सदर प्रकरणी करण्यात आलेल्या कार्यवाहीचा तिमाही अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत- स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक २०१८१०२४१५४३०४४७२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shankar Trambak Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD and Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cccfd79237cd08ae181b91f021d984be73c43b022 34d4c07b7da787cf666bc54, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2018.10.24 15:48:50 +05'30'

**(शं. त्र्यं. जाधव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२. सर्व सन्माननीय विधानसभा/ विधानपरिषद व संसद सदस्य
३. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४. मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
५. सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा. राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७. मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक
८. मा. लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय
९. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
११. राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
१२. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळ, मुंबई.
१३. राज्यातील संबंधित नगरपरिषदा / नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी
१४. नगर विकास विभागातील सर्व कार्यासन
१५. निवडनस्ती.